# सूची समिति

| | |
|---|---|
| श्री. जयंत श्रीधर टिळक | अध्यक्ष |
| " पांडुरंग सीताराम कुलकर्णी | सदस्य |
| " नारायण महादेव केतकर | " |
| " पुरुषोत्तम कृष्ण गर्दे | " |
| " शंकर नारायण वर्वे | " |
| " मुकुंद विठ्ठल सोवनी | " |
| " बाळकृष्ण दत्तात्रय फरकरे | " |
| " विष्णु कृष्ण मेहेंदळे | " व्यवस्थापक |

# सूची संपादनांतील सहकारी

| | |
|---|---|
| श्री. दत्तात्रय विष्णु जोग | १६ मे १९७८ – |
| सौ. विजया अनंत कुलकर्णी | " |
| कु. सुमन दत्तात्रेय महादेवकर | " |
| सौ. सुधा रघुवीर देशपांडे | १ ऑक्टोवर १९८० |
| सौ. प्रतिभा विलास पटवर्धन | १ एप्रिल १९८० – |
| श्री. रघुनाथ गंगाधर विद्वांस | १६ मे १९७८ – ६ डिसेंबर १९७९ |
| श्री. सुरेश बहिरू जाधव | १ ऑगस्ट १९७७ – ३१ जानेवारी १९८० |
| सौ. हेमलता श्यामकांत मेहेंदळे | १६ मे १९७८ – २६ जानेवारी १९७९ |

# केसरी शताब्दी सूची

( १८८१–१९८१ )

## खंड १ : १८८१–१९२०

संपादक :

ना. म. केतकर

केसरी प्रकाशन, पुणें

प्रसिद्धि :

दि. ४ जानेवारी १९८७

प्रकाशक :

पां. सी. कुलकर्णी
५६८ नारायण पेठ
पुणे ४११ ०३०



मुद्रक :

पां. सी. कुलकर्णी
केसरी मुद्रणालय
५६८ नारायण पेठ
पुणें ४११ ०३०

मूल्य १२० रुपये

# पुरस्कार

केसरी म्हणजे लोकमान्य टिळक हें अनेक कारणांनी आणि अनेक अर्थांनी लोकमानसांत अढळ राहिलेलें समीकरण. पण टिळकांच्या निधनानंतरहि केसरी लोकमान्यच राहिला, हें केसरीने शंभर वर्षांची वाटचाल करूनहि तो थांवला नाही, एवढें लक्षांत घेणाऱ्या कोणाहि विचारवंताला पटावें. ही टिळकांची पुण्याई असे विनम्रपणें म्हणण्यांतलाहि खरा अर्थ असा की, त्यांनी केसरीसाठी घालून दिलेली विचारांची आणि तत्त्वांची वैठकच अशी होती की, ती अखंड स्वयंचलित राहावी. लोकरंजनापेक्षा लोकजागृति व लोककल्याण हें ध्येय आणि त्या ध्येयसिद्धीसाठी कालानुरूप वदल, स्वतंत्र आणि निर्भीड मतप्रतिपादन व सामाजिक जीवनाच्या सर्वांगाचें यथार्थ दर्शन ही धोरणत्रयी अशी ती वैठक होती.

त्यामुळेच महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक जडणघडणीची आलोचना करणाऱ्या अनेक अभ्यासकांना केसरीचे जुने अंक पाहणें आज महत्वाचें वाटतें आणि कालांतरानेहि तसेंच वाटत राहील. आजवर किती तरी अभ्यासकांनी केसरीच्या संचिका पुन्हा पुन्हा, विविध माहितीच्या शोधासाठी चाळल्या आहेत. केसरीचे कित्येक अंक फार जीर्ण झाले आहेत, उपयोग करण्याच्या पलीकडे त्यांची अवस्था होत चालली आहे, याचें कारण केवळ कालगति किंवा हवामानाचा परिणाम नसून त्यांचा वापरच फार होत आला आहे, असें म्हणणें योग्य होईल. सुदैवाने आता जवळ जवळ सर्व अंक मायक्रोफिल्मवर उपलब्ध असून रीडरच्या साहाय्याने त्याचा उपयोगहि सहजपणें करतां येतो. यापुढे मायक्रोफिल्मवरील प्रतच अभ्यासकांना अधिक उपयोगी ठरेल.

अशा अभ्यासकांचा वेळ वाचावा व इष्ट किंवा अपेक्षित माहिती चटकन शोधतां यावी म्हणून केसरीच्या सूचीची आत्यंतिक गरज होती. केसरी शताब्दीच्या शुभसमयी अशी सूची तयार व्हावी हें योग्यच आहे. त्याप्रमाणे केसरी सूचीचा पहिला खंड आज प्रसिद्ध होत आहे. त्यामध्ये प्रारंभापासून म्हणजे ४ जानेवारी १८८१ पासून २८ डिसेंबर १९२० पर्यंतच्या केसरीच्या अंकांतील महत्त्वाच्या मजकुराची पद्धतशीर नोंद झालेली आहे. मराठी भाषेंतीलच केवळ नव्हे, तर देशी भाषांतील कोठल्याहि वृत्तपत्राची सूची अजून झालेली नाही. किंवहुना कोणत्याहि मराठी वृत्तपत्राचे गेल्या शंभर वर्षांचे सर्व अंक उपलब्ध नाहीत. टाइम्स, हिंदु यांसारख्या इंग्रजी वृत्तपत्रांचे अंक उपलब्ध आहेत, त्यांत महाराष्ट्राच्या संदर्भात व मराठी जीवनाच्या वा व्यक्तींच्या संदर्भातील माहिती अभावानेच सापडते किंवा सापडतच नाही.

केसरीच्या अंकांतील मजकूर पाहण्यासाठी या सूचींतील नोंदींचा उपयोग होईलच. पण तो हेतु न वाळगणारांनाहि सूचीमधील नोंदींचीं शीर्षकें व मजकुराचें अत्यल्प विवरण वाचूनहि महाराष्ट्राच्या अगदी अलीकडील इतिहासाच्या चाळीस वर्षांच्या कालखंडांत काय काय घडामोडी झाल्या, कोण कोण व्यक्ति प्रकाशांत होत्या, त्या वेळच्या समाजजीवनांत कोठल्या विषयांना प्राधान्य मिळालें, आपले कालदृष्टचा अगदी जवळचे पूर्वज कसे भांडले, कसे वागले, कशाने भारून गेले वगैरे किती तरी मनोरंजक गोष्टींची माहिती होईल. आणि अशा संदर्भासाठीहि सूची-ग्रंथ जवळ ठेवावासा वाटेल.

सूची तयार करण्याचें हें काम अतिशय परिश्रमाचें होतें. पण ती जवावदारी श्री. ना. म. केतकर व सूचीसमिति यांनी स्वीकारली व चिकाटीने आणि शास्त्रीय पद्धतीने पुरी केली यावद्दल आम्ही विश्वस्त त्यांचे आभारी आहोंत. उणिवा राहिल्या असल्या तरी परिश्रम कमी झाले नाहीत. सूची संपादनाच्या कामांत ज्या ज्या व्यक्तींनी साहाय्य केलें त्यांनी तें केवळ व्यवहारवुद्धीने केलें असें म्हणतां येणार नाही. लोकमान्य टिळकांविषयी आदरवुद्धि व केसरी संस्थेविषयी आपुलकी यामुळेच त्यांनी हे अतिकष्टाचें काम वेळेवर पुरें केलें आहे. केसरी संस्था त्यांची सतत आठवण ठेवील अशी विश्वस्त या नात्याने आम्ही ग्वाही देतो व सूचीचें यापुढील कामहि याच आपुलकीने त्यांच्याकडून होईल अशी आशा व्यक्त करतों.

जयंत श्रीधर टिळक पां. सी. कुलकर्णी
रा. वि. दारदेकर श. दा. गोखले
प. पां. वावळे

# अनुक्रमणिका

# प्रास्ताविक

साप्ताहिक केसरीच्या प्रकाशनाने, म्हणजे मंगळवार दि. ४ जानेवारी १८८१ पासून, मराठी वर्तमानपत्रांच्या इतिहासांत एका नव्या आणि निराळ्या युगाचा प्रारंभ झाला असें अनेकांनी म्हटलें आहे. मराठी भाषेंतील पहिलें वर्तमानपत्र 'दर्पण' कै. बाळशास्त्री जांभेकर यांनी, केसरीपूर्वी सुमारे पन्नास वर्षे, म्हणजे, दि. ६ जानेवारी १८३२ या दिवशीं सुरू केलें होतें.[1] त्यानंतरच्या पन्नास वर्षांत मराठींत अनेक वर्तमानपत्रें सुरू झालीं. त्या सर्वांची अचूक आणि संपूर्ण माहिती मिळण्याचें विश्वसनीय साधन अजून उपलब्ध नाही. पण त्यासंबंधी जीं थोडीं साधनें उपलब्ध आहेत त्यांवरून असें म्हणतां येईल कीं, केसरी साप्ताहिकाच्या सुरुवातीस महाराष्ट्रांत, निव्वळ मराठी भाषेंत सत्तावीस आणि इंग्रजी-मराठी अशा जोड-भाषेंत अकरा म्हणजे एकूण अडतीस वर्तमानपत्रें साप्ताहिक, द्वि-साप्ताहिक अशा रूपांत प्रसिद्ध होत असत. मुंबई, पुणें तसेंच ठाणें, जळगाव, धुळें, रत्नागिरी, सातारा, सोलापूर, बेळगाव, धारवाड, अहमदनगर वगैरे तत्कालीन मुंबई इलाख्याच्या कित्येक जिल्ह्यांच्या मुख्य ठिकाणांहून हीं वर्तमानपत्रें प्रसिद्ध होत असत. केसरीच्या अगोदर सुरू होऊन पुढे पन्नास वर्षां-पर्यंत केसरीबरोबरच चालू राहिलीं अशा वर्तमानपत्रांत, ज्ञानोदय, ज्ञानप्रकाश, शुभसूचक, बेळगाव समाचार, कल्पतरु, आनंदवृत्त, सत्यशोधक, खानदेश वैभव, ज्ञानसागर, सुबोधपत्रिका, सुबोधसिंधु, प्रबोधचंद्रिका या पत्रांचा उल्लेख करावयास हवा. थोडक्यांत म्हणायचें तर पेशवाईच्या अस्तानंतर अवघ्या पंधरा वर्षांत सुरू झालेला मराठी वृत्तपत्रांचा संसार केसरीच्या सुरुवातीपर्यंत अगदीच रोड राहिला होता असें म्हणतां येणार नाही.

असें असूनहि केसरीची सुरुवात ही नव्या युगाची सुरुवात झाली असें मानलें जातें. "वर्तमानपत्रांना देखील म्हणण्यासारखें स्वरूप १८८१ सालीं केसरी वर्तमानपत्र सुरू झाल्यानंतरच आलें असें म्हणण्यास हरकत नाही."[२] या म्हणण्यांतील सूचकता कांहीशा विस्ताराने सांगितली गेली आहे ती अशी —

"१८८१ मध्ये केसरी, मराठा हीं मराठी व इंग्रजी वृत्तपत्रें काढणाऱ्या तरुणांनी अर्थात् आगरकर-टिळकांनी महाराष्ट्रांत लोकसेवेचें नवें युग सुरू केलें. स्वार्थत्यागाच्या पुण्याईचें बळ महाराष्ट्रांतील वृत्तव्यवसायाला आरंभापासून असलें तरी लोकशिक्षण, लोकजागृति हेंच जीवनाचें इतिकर्तव्य विद्यार्थिदशेंत निश्चित करून त्याला आपलें जीवनसर्वस्व वाहणारी आगरकर-टिळकांची जोडी होती. त्यांच्या स्वार्थत्यागाशीं आधीच्या पिढ्यांतील वृत्तपत्रकारांपैकी कुणाचीहि तुलना करतां येणार नाही. निर्वाहाचा व्यवहार संभाळून मिळणाऱ्या फुरसतीचा व शिलकी पैशांचा लोकजागृतीच्या कार्यात वेच करणें हें निराळें आणि आयुष्याचा प्रत्येक क्षण लोकोद्धाराच्या कार्यात खर्ची घालणें हें निराळें. निस्सीम स्वार्थत्यागाच्या सडेतोडपणाची बरोबरी मर्यादित स्वार्थत्यागाला कशी करतां येणार! आगरकर-टिळकांच्या स्पष्टोक्ती-मध्ये कसल्याहि स्वार्थी ओशाळगतीचा डाग सापडत नाही. निर्भेळ ध्येयवादाचे ते पहिले प्रतिनिधि होते."[३]

वरील दोन्ही उल्लेख केसरी व टिळक यांच्या विचारप्रणालींशीं फारसें सहमत नसलेल्या किंबहुना केसरी व टिळक यांच्याविषयी विरोधभाव बाळगणाऱ्या दोन महाराष्ट्रीय विद्वानांचे आहेत हें ध्यानांत घेतलें म्हणजे केसरी साप्ताहिकाने खरोखरच नव्या आणि निराळ्या युगाचा प्रारंभ केला हें कोणालाहि सहज पटेल.

## वृत्तपत्राचें महत्त्व

प्रत्यहीं प्रसिद्ध होणाऱ्या पुस्तकांपैकी पुष्कळ पुस्तकांचें महत्त्व तीं जसजशीं जुनीं होतात त्या प्रमाणांत कमी होत जातें. त्यांचा वापर कमी होत जातो; कारण त्यांचा उपयोग कमी कमी होत असतो. अशांपैकी कांही पुस्तकांच्या सुधारित

---

१. कै. त्र्यं. शं. शेजवलकर यांनी नवभारत मासिकाच्या जुलै १९५१ मध्ये 'पहिलें मराठी वर्तमानपत्र' या आपल्या लेखांत 'मुंबापूर वर्तमान' असें एक वृत्तपत्र २० जुलै १८२८ ला मुंबईत सुरू झालें होतें व कदाचित् त्याहिपूर्वी एखादें मराठी वर्तमानपत्र सुरू झालें असेलहि, अशा आशयाचा कांही पुरावा दिला आहे.

२. आळतेकर, मा. दा., 'नियतकालिक वाङ्मय', महाराष्ट्र साहित्यपत्रिका, वर्ष १ अंक २, १९२८, परिषद वार्ता, पृ. १–२.

३. फाटक, न. र., प्रस्तावना, 'वृत्तपत्रांचा इतिहास' – लेखक वि. कृ. जोशी व रा. कृ. लेले, खंड १ (१७८०–१८८०), मुंबई, युगवाणी प्रकाशन, १९५१ पृ. २१.

आवृत्त्या काढाव्या लागतात. तरी सुद्धा अशा सुधारित आवृत्त्यांचीहि कालांतराने तीच स्थिति होते. वर्तमानपत्रांच्या बाबतींत कांहींची उलट स्थिति असते. तीं जितकीं जुनीं तितकें त्यांचें महत्त्व अभ्यासकांना अधिक वाटतें. वर्तमानपत्रें म्हणजे आजूबाजूला, जवळ आणि दूर, जें जें कांही घडत असतें त्यामधून प्रातिनिधिक आणि अपवादात्मक असें जें असेल त्याची निवड करून आपआपल्या ध्येयधोरणानुसार केलेली नोंद. अशा नोंदी म्हणजे एक प्रकारे त्या त्या दिवसाचा इतिहासच असतात. इतिहासाची पुनरावृत्ति होत नाही म्हणून वर्तमानपत्राची सुधारित आवृत्ति नसते. "कोठल्याहि देशाचा खरा इतिहास फक्त त्या देशाच्या वृत्तपत्रांत असतो" असें मेकॉलेने म्हटलें आहे, तें अनेक अर्थांनी खरें आहे. शिवाजीच्या काळीं वर्तमानपत्रें असतीं आणि तीं आज उपलब्ध असतीं, तर आज त्या काळाविषयी अज्ञात राहिलेल्या कित्येक गोष्टी ज्ञात झाल्या असत्या. आजचे कित्येक वाद सुरू सुद्धा झाले नसते. महाराष्ट्राचा इतिहास अधिक समृद्ध झाला असता.

वर्तमानपत्रें जुनीं झालीं म्हणजेच केवळ त्यांचें महत्त्व वाढतें असा याचा अर्थ नव्हे. कोठल्याहि समाजाची धारणा, प्रगति आणि उत्कर्ष यांविषयी अनुमान करावयाचें झाल्यास त्या समाजामध्ये परस्पर-संपर्काचीं साधनें किती, कोणतीं आणि किती प्रमाणांत उपलब्ध आहेत याविषयी माहिती करून घेणें आवश्यक असतें. अशा साधनांमध्ये पुस्तकें, नियतकालिकें, वर्तमानपत्रें, आकाशवाणी, दूरदर्शन वगैरेंचा समावेश व्हावयास हवा. पण या सर्व साधनांमध्ये प्रत्येकाला सहज उपलब्ध आणि प्रत्येकाच्या आवाक्यांतील साधन म्हणजे रोजचें वर्तमानपत्रच होय. चालू घडीचा आणि जुन्या काळाचा विविधरंगी इतिहास समजण्याचें एकमेव साधन म्हणजे दैनिक वर्तमानपत्र असें म्हणण्यांत फारशी अतिशयोक्ति नाही.

## वृत्तपत्र सूची

मराठी भाषेंत सूची शब्द हा बव्हंशी यादी या अर्थानें रूढ झाला आहे. त्यामुळे मराठी ग्रंथ-सूची, मराठी नियतकालिकांची सूची, महाराष्ट्र साहित्यपत्रिका सूची किंवा एखाद्या कार्यालयांतील अधिकाऱ्यांची ज्येष्ठता सूची असे सूची शब्दाचे प्रयोग सहज आढळतात. सूची शब्दाचा यादी हा अर्थ रूढ झाला आहे म्हणून व यापुढेहि तो राहणार असला तरी, सूची या शब्दाला आणखी एक अर्थ आहे. पुस्तकें, नियतकालिकें, वर्तमानपत्रें आणि अशाच प्रकारचीं आणखी कांही प्रकाशनें. जसें – परिषदा, संमेलनें, समित्या, परिसंवाद, विधिमंडळें, संस्था इत्यादींचे अहवाल. या सर्वांना सामान्य अर्थानें वृत्तवाहक असें म्हणतां येईल. वृत्त म्हणजे माहिती, बातमी किंवा इंग्रजीमध्ये ज्याला 'इन्फर्मेशन' म्हणतात अशा आशयाचा एक सोपा व सुटसुटीत शब्द. वृत्तवाहकांची नोंद म्हणजे रूढार्थानें सूची व वृत्तवाहकांतील वृत्ताची नोंद म्हणजेच खऱ्या अर्थानें सूची या दृष्टीनें पहिलें तर पुष्कळ पुस्तकांच्या अखेरीस जोडलेली असते अशी पुस्तक-सूची व वर्तमानपत्रांतील मजकुराची तयार केलेली पद्धतशीर नोंद, असे दोनच सूचीचे योग्य प्रकार आहेत.

पुस्तक-सूचीचें उद्दिष्ट, उपयुक्तता व महत्त्व याविषयी पुष्कळ विचार प्रसिद्ध झाला आहे. ती तयार करण्याच्या तंत्रांतहि बरीचशी निश्चितता आली आहे. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय मानक संस्थांनी सूचीविषयक मानकें प्रसिद्ध केली आहेत. भारतीय मानक संस्थेनेहि असें मानक प्रसिद्ध केलें आहे; तथापि वृत्तपत्र सूचीसाठी मार्गदर्शक होईल असें साहित्य इंग्रजी भाषेंतहि अजून फारसें उपलब्ध नाही, हें थोडें नवलपूर्ण वाटेल. वस्तुतः लंडन टाइम्स या अग्रगण्य वर्तमानपत्राची सूची इ. स. १७९० पासून प्रसिद्ध होत आहे. आणि इ. स. १८५१ पासून न्यूयॉर्क टाइम्स या दुसऱ्या विख्यात वृत्तपत्राची सूची नियमाने आणि अलीकडे तर दर पंधरवड्याला प्रसिद्ध होत असते. गणक-यंत्राची सुविधा उपलब्ध झाल्यामुळे आता अनेक अमेरिकन वृत्तपत्रांची एकत्र सूची प्रसिद्ध होण्यास सुरुवात झाली आहे. भारतामध्ये टाइम्स ऑफ इंडियाची सूची गेलीं कांही वर्षे प्रसिद्ध होत असते. गेलीं बारा वर्षे भारतातील २८ इंग्रजी वर्तमानपत्रांतील निवडक मजकुराची एकत्रित सूची दिल्ली येथील ग्रंथालय संघाकडून प्रसिद्ध होत आहे; तथापि भारतीय भाषांतील एकाहि वर्तमानपत्राची सूची अजून उपलब्ध नाही. आणि सुमारे दोन वर्षांपूर्वी केसरी संस्थेने केलेला केसरी शताब्दी सूचीचा संकल्प, जो आज त्या सूचीच्या प्रथम खंडाच्या प्रकाशनाने सिद्धीस जात आहे तो वगळतां, दुसऱ्या कोठल्याहि भारतीय भाषेंतील वृत्तपत्राची सूची होत असल्याचें ऐकिवात नाही.

## वृत्तपत्र सूचीचें महत्त्व

सूचीचे दोन प्रधान उपयोग असतात. एखादी माहिती किंवा वृत्त एकदा वाचून झालें असलें आणि तें पुन्हा हवें असलें तर तें अचूकपणें शोधतां येणें हा सूचीचा मुख्य उपयोग. तितक्याच महत्त्वाचा दुसरा उपयोग म्हणजे हवी असलेली माहिती किंवा वृत्त पूर्वी वाचून माहीत झालेलें नसलें तरी तें अचूकपणें कोठे मिळेल याविषयी अंदाज करून तें शोधता येणें. प्रत्येक प्रकाशनाला सूची असेल तर सूचीचीं ही दोन्ही उद्दिष्टें साध्य होण्याचा संभव सर्वाधिक असतो. पण एखाद्या पुस्तकाला सूची नसली तरी फारसें बिघडत नाही. हव्या असलेल्या माहितीवरून विषयाचा अंदाज बांधता येतो. त्या विषयावरील अनेक पुस्तकें ग्रंथालयांतून किंवा अन्य ठिकाणांहून मिळवितां येतात; आणि एखादें पुस्तक सूचीविरहित असलें तरी तें समग्र वाचता येतें किंवा त्याच पुस्तकाच्या अनुक्रमणिकेवरून अंदाज करून तें चाळतां येतें व हवी ती माहिती शोधतां येते. वर्तमानपत्राच्या बाबतीत थोडा निराळा प्रकार असतो. पुस्तकाप्रमाणे वर्तमानपत्राला एकच एक किंवा ठरा-विक विषय नसतात. अमुक एक माहिती वर्तमानपत्रांत आलीच नसेल असें म्हणणें फार धाडसाचें असतें. ती माहिती कोठल्या तरी वर्तमानपत्रांत आली असेलहि अशी भूमिका ठेवणें रास्त असतें. हव्या असलेल्या माहितीविषयी स्थलकालाचीं परिमाणें लावून कांही अंदाज करतां येतात. पण त्यासाठीहि वर्तमानपत्राचे अनेक अंक पाहवे लागतात. आणि त्या अंकांमध्ये ती माहिती सापडली नाही. तरी दुसऱ्या एखाद्या वर्तमानपत्रांत ती आली असेलहि ही अपेक्षा शिल्लक राहते. वर्तमानपत्रांतील माहितीचा शोध घेण्यांत आणखी एक अडचण असते. पुस्तक कितीहि जुनें असलें, दुष्प्राप्य-असलें तरी तें मिळवितां येतें. एका पुस्तकांतील माहिती कितीहि विवक्षित असली, तरी ती दुसरी अनेक पुस्तकें चाळून मिळण्याचा संभव पुष्कळ असतो. पण जुनीं वर्तमानपत्रें सहज मिळणें शक्य नसतें. वर्तमानपत्रें संभाळून ठेवणें व्यक्तीला शक्य नसतें. ग्रंथालयांनाहि तें फारसें जमलेलें नाही. शिवाय एका वर्तमानपत्रांत येणारी माहिती त्या त्या वर्तमानपत्राची निवड आणि संपादकीय धोरण याच्याशीं संबंधित असते. त्यामुळे वरकरणीं पुष्कळ वर्तमानपत्रांत तीच ती माहिती आहे असें वाटलें तरी मूलतः ती भिन्न असते.

वर्तमानपत्राचा एक अंक म्हणजे विविध माहितीचें एक अल्पसें कोठार असतें. असे अनेक वर्षांचे अंक म्हणजे माहितीचें किती प्रचंड कोठार होईल याची कल्पनाच केलेली बरी. एवढ्या मोठ्या कोठारांतून हवी ती माहिती मिळविणें म्हणजे गवताच्या प्रचंड गंजीमधून सुई शोधण्यासारखें असतें आणि यासाठीच सूचीची गरज असते. तत्त्वतः वर्तमानपत्रां-तील अशेष मजकूर सूचीक्षम मानून तो चटकन शोधतां यावा म्हणून प्रत्येक शोधकाच्या गरजेनुसार सूचीबद्ध झाला तर ती सूची उत्तम असें म्हणावयास हवें. अशी आदर्श सूची अशक्यप्राय असली तरी तो आदर्श दृष्टीसमोर ठेवूनच कोठल्याहि वर्तमानपत्राची सूची तयार व्हावयास हवी.

## वृत्तपत्र सूचीचें तंत्र

तंत्रदृष्ट्या सूची म्हणजे अभ्यासकांना उपयोग होईल अशा मजकुराची शोधसुलभ नोंद. अशी प्रत्येक नोंद त्रिस्तरीय असावी. शिरोभागीं त्या त्या मजकुराचा मुख्य आशय व्यक्त होईल असे एक किंवा अधिक विषयवाचक शब्द. दुसऱ्या स्तरावर केवळ शीर्षकावरून पूर्ण बोध होणार नाही असें वाटल्यास मूळ मजकुरांतील आशयाचें त्रोटक विवरण. आणि तिसऱ्या स्तरावर तो मजकूर वर्तमानपत्राच्या अंकांत नेमका कोठे मिळेल याचा संदर्भ. शीर्षक, विवरण आणि संदर्भ असे वृत्तपत्र सूचींतील नोंदीचे तीन घटक मानले, तरी त्यांपैकी प्रत्येक घटकाचा तारतम्याने संकोच किंवा विस्तार करून ती ती नोंद बोधप्रद आणि शोधसुलभ करणें शक्य असतें. शीर्षक सूक्ष्मातिसूक्ष्म विषयवाचक करतां येतें किंवा तेंच थोडें स्थूलरूप ठेवून विवरणाच्या जोडीने तितकेंच बोधप्रद करतां येतें. न्यूयॉर्क टाइम्सच्या सूचीमध्ये शीर्षक स्थूलरूप असतें, पण विवरण पुष्कळदा मूळ मजकुराच्या साररूप असतें. तसेंच त्या सूचीमध्ये संदर्भातच तो मजकूर दीर्घ म्हणजे दोन स्तंभांहून अधिक आहे, मध्यम म्हणजे दोन स्तंभांहून कमी पण अर्ध्या स्तंभाहून अधिक आणि लघु म्हणजे अर्ध्या स्तंभाहून कमी असें व्यक्त करणारी L म्हणजे Long, M म्हणजे Medium व S म्हणजे Short अशीं संक्षिप्तें जोडलेलीं असतात. लंडन टाइम्सच्या सूचीमध्ये पुष्कळदा शीर्षकाखाली नुसते अग्रलेख किंवा पत्रव्यवहार असें म्हणून त्यांचे संदर्भ दिलेले असतात.

अग्रलेखांचे मथळे किंवा पत्रांतील मजकुराचें विवरण नसतें. सारांश, प्रत्येक नोंद बोधप्रद व शोधसुलभ करण्यासाठी जें जें करणें इष्ट वाटेल व शक्य असेल तें तें करून सूचीची उपयुक्तता वाढविण्याचें धोरण ठेवणें हाच एक योग्य मार्ग आहे. त्यासाठीच सूचीमध्ये परस्पर-संबंधित शीर्षकें जोडून दाखविण्यासाठी पर्यायी व पूरक अशा नोंदी असतात. मराठीमध्ये त्यांना आडवे संदर्भ (Cross references) असेंहि म्हणतात. सूचीमध्ये हव्या असलेल्या माहितीचा शोध त्या माहितीच्या मुख्य विषयाच्या आधाराने करावयाचा असतो. त्यामुळे प्रत्येक सूची ही मूलतः विषय-सूचीच असते. तथापि पुष्कळदा हवी असलेली माहिती, विशेषतः वर्तमानपत्रांतील माहिती, कोठल्या तरी व्यक्तीसंबंधी, संस्थेसंबंधी किंवा स्थलांसंबंधी असते. त्यामुळे व्यक्तिनाम, संस्थानाम किंवा स्थलनाम यांच्या आधाराने माहिती शोधणें अवश्य असतें आणि सोपेंहि होतें. एक प्रकारे अशा बाबतींत व्यक्तिनाम, संस्थानाम व स्थलनाम त्या त्या महितीच्या संदर्भात विषयरूपच होतात. म्हणून त्यांची शीर्षकांच्या स्थानी नोंद करावी लागते; किंवा पर्यायी वा पूरक नोंदी करून विषयवाचक शीर्षकांशीं जोड दाखवावी लागते. न्यूयॉर्क टाइम्सच्या सूचीमध्ये प्राचुर्याने व्यक्तिनामांची अशी जोड दाखविलेली असते. विषयवाचक, व्यक्तिवाचक, संस्थावाचक व स्थलवाचक सर्व नोंदी शीर्षकांच्या वर्णक्रमानुसार लावल्या म्हणजे सूची तयार होते.

## केसरी सूची

केसरी साप्ताहिकाचें महत्त्व या प्रास्ताविकाच्या प्रारंभींच लिहिलें आहे. पण सूचीकरणासाठी केसरीचें एक वेगळें महत्त्व आहे. केसरीपूर्वी आणि केसरीबरोबर सुरू झालेलीं अनेक वर्तमानपत्रें असलीं तरी त्यांपैकी एकाहि वर्तमानपत्राचे सगळे अंक आज उपलब्ध नाहीत. केसरी हें मराठींतील एकमेव वर्तमानपत्र आहे की जें सतत, विनाखंड शंभर वर्षे चालत राहिलें असून त्याचे जवळ जवळ सर्व अंक उपलब्ध आहेत. ते अंक मूळ स्वरूपांत उपलब्ध आहेत तसेच ते मायक्रोफिल्मवर पण आहेत. त्यामुळे अभ्यासकांना एक महत्त्वाचें साधन आज सहज उपलब्ध आहे. तेंच एक साधन असल्यामुळे, त्या काळाचा अभ्यास करणारांचा वेळ वाचावा, त्यांपैकी प्रत्येकाला ते अंक वारंवार चाळावे लागू नये म्हणून केसरीची पद्धतशीर सूची प्रथम तयार होणें औचित्यपूर्ण आहे.

केसरीची सूची असावी हा विचार पूर्वीहि झाला होता. केसरीच्या सुवर्णमहोत्सवाच्या वेळीं 'केसरी प्रबोध' असा ग्रंथ सन १९३१ मध्ये प्रसिद्ध झाला होता. त्या ग्रंथाची पूर्वतयारी म्हणून कै. श्रीपाद रामचंद्र टिकेकर यांनी केसरीच्या पहिल्या पन्नास वर्षांतील अडीच हजार अंकांतून सुमारे वीस हजार नोंदी तयार केल्या होत्या. त्या नोंदी आज उपलब्ध नसल्यामुळे त्या सूचीचें निश्चित रूप काय होतें तें सांगतां येत नाही. पण बहुधा त्या नोंदी राजकीय, धार्मिक, ऐतिहासिक, सामाजिक अशा प्रमुख विभागानुसार असून जरुरीप्रमाणे त्यांचे कांही पोटविभागहि केले होते.

केसरीला दि. ४ जानेवारी १९८१ ला शंभर वर्षें पूर्ण होतात. त्या निमित्ताने योजलेल्या शताब्दी कार्यक्रमांतील एक कार्यक्रम म्हणजे शंभर वर्षातील केसरीच्या अंकांची केसरी शताब्दी सूची तयार करावी असें केसरीच्या विश्वस्तांनी ठरवून त्यासाठी दि. २२ ऑक्टोबर १९७७ या दिवशीं प्राथमिक विचारासाठी एक बैठक बोलावली होती. पुणें शहरांतील कांही प्रमुख ग्रंथपाल आणि कांही सूचीकार बैठकीस हजर होते. श्री. जयंतराव टिळक यांनी सूचीसंबंधी केसरीची भूमिका स्पष्ट करून या राष्ट्रीय महत्त्वाच्या कार्याला सर्वांनी सहकार्य द्यावें असें आवाहन केलें. त्यानंतर सूचीविषयी एक स्वयंपूर्ण योजना तयार करण्यासाठी एक समिति नेमण्यांत आली. या सूची समितीने योजनेचा एक प्राथमिक आराखडा समितीच्या दि. २९ जानेवारी १९७८ ला भरलेल्या बैठकीत तयार करून तो अभिप्रायासाठी सुरुवातीच्या बैठकीस उपस्थित असलेल्या सर्व सदस्यांकडे पाठविला. त्यानंतर दि. २० फेब्रुवारी १९७८ रोजीं भरलेल्या बैठकींत केसरीचे विश्वस्त श्री. हरिभाऊ कुलकर्णी यांच्या उपस्थितींत योजनेचा सुधारित आराखडा संमत करण्यांत आला. पुढे दि. २२ एप्रिल १९७८ रोजी सूची समितीची शेवटची बैठक भरली होती. त्या वेळीं केसरीचे विश्वस्त श्री. जयंतराव टिळक, श्री. हरिभाऊ कुलकर्णी, व मॅनेजर श्री. व. ल. बष्ट उपस्थित होते. योजनेसंबंधी पुन्हा विचार होऊन योजनेस अंतिम संमति देण्यांत आली. याच बैठकींत संपादक-नियुक्ती, संयोजक समिति, सूचीसहायकांची निवड, कार्यालय व आवश्यक खर्च वगैरेसंबंधी ठराव करण्यांत आले. योजनेनुसार केसरी शताब्दी सूची खंडशः प्रसिद्ध व्हावी व पहिला खंड केसरीच्या ४

जानेवारी १८८१ पासून ३१ डिसेंबर १९२० पर्यंतच्या चाळीस वर्षांतील अंकांचा समावेश करून, तो दि. ४ जानेवारी १९८१ ला प्रसिद्ध होण्यासाठी तयार करावा असें ठरलें. दि. १ मे १९७८ ला महाराष्ट्रदिनीं टिळक स्मारक मंदिरांत श्री. जयंतराव टिळक यांच्या अध्यक्षतेखाली एक लहानसा समारंभ होऊन केसरी सूची कार्यालयाचें उद्घाटन होऊन त्याच दिवशीं सूचीच्या कामास प्रारंभ झाला. त्यानंतर सुमारे दोन वर्षांनी म्हणजे दि. १७ मार्च १९८० रोजीं टिळक स्मारक मंदिरांत विश्वस्त श्री. हरिभाऊ कुलकर्णी व श्री. प. पां. वावळे यांच्या उपस्थितींत केसरी शताब्दी सूचीच्या पहिल्या खंडाची मुद्रणप्रत विश्वस्त श्री. वावळे यांच्या हाती समारंभपूर्वक देण्यांत आली. पहिला खंड आज दि. ४ जानेवारी १९८१ ला प्रसिद्ध होत आहे.

केसरी शताब्दी सूचीचा हा प्रथम खंड तयार होण्यास दोन वर्षें लागलीं. एवढ्या अवधींत प्रारंभापासून जवळ जवळ अखेरपर्यंत सूचीकरणाविषयी कांही ना कांही अडचणी येतच राहिल्या. अनेक प्रश्न उपस्थित झाले. सुसंगति हा सूचीचा प्राण समजला जातो. पण ही सुसंगति संभाळणें नेहमीच किंवा निरपवाद साधलें नाही. अभ्यासकाला हव्या त्या माहितीचा शोध घेणें शक्य व्हावें म्हणून पुष्कळदा सुसंगतीला मुरड घालावी लागली. वर्तमानपत्राची सूची करणें हें अतिशय कठीण आणि किचकट काम आहे, असें लंडन टाइम्सच्या सूचीच्या संदर्भात एका आद्य सूचीकाराने लिहून ठेवलें आहे त्याचा पुन्हा पुन्हा प्रत्यय आला. सूचीकरणांत आलेला अनुभव विस्ताराने लिहिण्याची वेळ अजून आली नाही असें वाटतें. कदाचित् केसरी शताब्दी सूचीचा अखेरचा खंड प्रसिद्ध होईल त्या वेळीं तें लिहिणें उचित होईल. तथापि एवढें मात्र नमूद करावेसें वाटतें की, यानिमित्ताने सूची-शास्त्राविषयी अनेकविध वाचन, चिंतन आणि चर्चा करतां आली, हें समाधान मोठें होतें. आणि त्याहूनहि मोठें आणि मोलाचें समाधान लाभलें तें म्हणजे केवळ या सूचीच्याच निमित्ताने आधुनिक महाराष्ट्राच्या एका महत्त्वपूर्ण कालखंडाच्या इतिहासाशीं अनायासें जवळीक घडली. त्या कालखंडांत जीं थोर माणसें होतीं त्यांच्या जवळपास वावरत असल्यासारखें वाटलें. ‘ क्लेश: फलेन हि पुनर्नवतां विधत्ते ।’ या महाकवि कालिदासाच्या उक्तींतील, सूचीच्या संदर्भात, फल तें हेंच.

शेवटीं एकच आशा आणि तीच प्रार्थना. थोड्या तरी अभ्यासकांना या सूचीचा चांगला उपयोग होवो आणि केसरीच्या प्रकाशनाने मराठी वृत्तपत्रांच्या इतिहासांत नवा कालखंड सुरू झाला त्याचप्रमाणे मराठी भाषेंतीलच नव्हे, तर भारतीय भाषांतील वृत्तपत्र सूचीच्या इतिहासाला केसरी सूचीने प्रारंभ होवो. इत्यलम् ।

**ना. म. केतकर**

# ऋणनिर्देश

केसरी शताब्दी सूची प्रसिद्ध होत असतांना ज्यांची आठवण होणें अपरिहार्य आहे अशा अनेक व्यक्ती आहेत.

१. सर्वारंभीं केसरी-मराठा संस्थेचे विश्वस्त. शताब्दी सूची व्हावी हा मूळ विचार त्यांचा. विश्वस्त आणि आता महाराष्ट्र राज्याचे ऊर्जामंत्री श्री. जयंतराव टिळक यांनी दि. २२ ऑक्टोबर १९७७ ला बोलावलेल्या बैठकीत तो प्रथम व्यक्त केला. तेव्हापासून त्यांनी आणि श्री. हरिभाऊ कुलकर्णी व इतर विश्वस्तांनी सूची कार्याकडे आत्मीयतेने दृष्टि ठेवली, सर्व आवश्यक सोयी उपलब्ध करून दिल्या आणि सूची कार्याच्या जबाबदारीला अवश्य तेवढा अधिकार, स्वातंत्र्य आणि विश्वास यांची जोड दिली. दडपणावांचून जोखीम असा अविस्मरणीय अनुभव मिळाला.

२. सूची समितीच्या सदस्यांनी वेळोवेळीं प्रोत्साहनपर अभिप्राय व्यक्त केले. त्यांतहि श्री. पुरुषोत्तम कृष्ण गर्दे यांचा वाटा सर्वाधिक. सूचीविषयक अडचणींत टाकणाऱ्या अनेक समस्यांसंबंधी, शांतपणें आणि न कंटाळतां, स्वतःच्या दीर्घ अनुभवावर आधारलेल्या दृष्टींतून चर्चा करून, पुष्कळ समस्या उकलून दाखवून, कांही समस्यांवर त्यांनी तोडगे सुचविले. हें त्यांचें ऋण मोठेंच.

३. नमुना सूची छापून महाराष्ट्रांत अनेक जाणकारांकडे पाठविण्यांत आली होती. त्यांपैकी कित्येकांनी विस्ताराने अभिप्राय कळविले. कांहींनी प्रत्यक्ष भेटून उत्तेजन दिलें.

४. सूची कार्यालयाचे व्यवस्थापक श्री. विष्णुपंत मेहेंदळे. वेळेवर आणि व्यवस्थित हे त्यांच्या कामाचे प्रमुख गुण. ह्या गुणांचा लाभ अग्रहक्काने सूची-कार्याला झाला.

५. वृत्तपत्रांची सूची करणें म्हणजे अतिशय किचकट आणि कठीण काम. पण जे सहकारी लाभले त्या सर्वांनी, अशा कामाचा पूर्वानुभव नसतांनाहि आपल्या निरलसतेने, तत्परतेने, परिश्रमाने आणि प्रगल्भ बुद्धीने तें शक्य तेवढें सरळ आणि सोपें केलें. मतभेद झाले पण मनें स्वच्छ राहिलीं आणि सुहृद्‌भाव कमी न होता वाढला.

६. सूचीची मुद्रणप्रत, मूळ हस्तलिखित लहान आकाराच्या असंख्य कागदांवरून तयार करणें म्हणजे प्रत्यक्ष सूची तयार करण्यापेक्षाहि अधिक कष्टदायक व विलंबाचें काम. पण केसरी मुद्रणालयाचे श्री. भास्करराव कुलकर्णी, श्री. क. वि. पित्रे आणि संबंधित इतर सहकारी यांनी उदार मनाने, निर्दोष मुद्रण प्रतीचा आग्रह न धरतां, मूळ हस्तलिखितांचा स्वीकार करून मुद्रणास सुरुवात केली आणि अपार कष्ट घेऊन वेळेवर सूची ग्रंथाच्या प्रकाशनास मोलाचें साहाय्य केलें.

७. या सर्व सज्जनांना मनःपूर्वक धन्यवाद.

८. या सूचीकार्याची जबाबदारी पत्करण्याची प्रेरणा ज्यांच्या स्मृतीमुळे झाली व सूची तयार होत असतांना प्रत्यहीं आणि पदोपदीं ज्यांची स्मृति पाठीशी राहिली त्या लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचें पुण्यस्मरण.

## सूची पाहण्यापूर्वी –

१. केसरी साप्ताहिकाच्या प्रारंभापासून म्हणजे मंगळवार दि. ४ जानेवारी १८८१ पासून मंगळवार दि. २८ डिसेंबर १९२० पर्यंतच्या जवळ जवळ सर्व अंकांची (पुरवणी अंक धरून) सूची या खंडांत समाविष्ट आहे. जे अंक मुळांत किंवा मायक्रोफिलमवर सुद्धा मिळाले नाहीत त्यांची तपशीलवार वेगळी यादी जोडली आहे. तसेच दिवाळीनिमित्त जे अंक प्रसिद्ध झाले नाहीत त्यांचीहि तपशीलवार वेगळी यादी जोडली आहे.

२. केसरीच्या अंकांतील एकूण मजकुराचे अग्रलेख (अग्र०), पत्रकर्त्याच्या स्फुट सूचना (स्फु०), इतरांचे लेख (ले०) व वाचकांचीं पत्रें (प०) असे चार प्रमुख गट मानून उर्वरित मजकुराचा संकीर्ण (सं०) असा वेगळा गट मानला आहे.

३. सूचीतील एक संपूर्ण नोंद म्हणजे अलग शीर्षकाखाली वर उल्लेखिलेल्या गटक्रमानुसार उपलब्ध मजकुराची केलेली नोंद असें समजावें. विषय अथवा व्यक्ति, संस्था, स्थळ वगैरेवाचक शब्दांनी शीर्षक व्यक्त केलें आहे.

४. प्रधान शीर्षकाला एक किंवा अधिक शब्द – अशा चिन्हांनी जोडून अभिप्रेत विषय समर्पक करण्याचा प्रयत्न केला आहे.

५. बहुतेक नोंदीमध्ये शीर्षकाला पूरक होईल अशा शब्दांनी त्रोटक विवरण दिलें आहे.

६. प्रत्येक नोंदीमध्ये मजकुराचा संदर्भ, वर्ष, महिना, तारीख, पृष्ठ व स्तंभ अशा क्रमाने दिला आहे.

७. दोन किंवा अधिक शीर्षकांमध्ये सहज लक्षांत येणारे पूरक आणि पर्यायी संबंध, 'पाहा' व 'आणखी पाहा' अशा सूचनेने दाखविले आहेत.

८. प्रत्येक वेगळ्या शीर्षकाखाली असलेल्या नोंदी क्रमाने गटवार आहेत. जसे – अग्र०, स्फु०, ले०, प० आणि सं०, तसेच प्रत्येक गटांतील नोंदी मजकुराच्या कालक्रमानुसार आहेत. तथापि कांही ठिकाणीं संदर्भ सुलभतेसाठी कालक्रमांत थोडासा व्यत्यय झाला आहे.

९. सूचींतील नोंदीचा क्रम शीर्षकांतील शब्दानुसार वर्णाप्रमाणे आहे. यासंबंधी मराठी शब्दकोशांत भिन्न प्रकार आढळतात. या सूचींत वर्णक्रम असा आहे – क, कं, कॅ, कँ, क्र, क्ल, क़ा, कॉ, क्रा, क्रॉ, कि, क्रि आणि याप्रमाणे. हा फ़रक सोडून सर्व अक्षरांचा रूढ क्रमच पाळला आहे. थोडक्यांत म्हणजे अनुस्वार, चंद्रकोर व जोडाक्षर यांबाबतच सहज लक्षांत येण्यासारखा फरक केला आहे.

१०. शुद्धलेखन केसरी मुद्रणालयानें संमत केलेलें आहे.

११. केवळ बातमीवजा अशीं अनेक सदरें, केसरीच्या अंकांत नियमितपणें, कांही काळ नियमितपणें किंवा वेळोवेळीं प्रसिद्ध होत असत. जसे – अनुक्रमणिका, इहवृत्त, ठिकठिकाणचे गणेशोत्सव, दुष्काळ, प्लेग, शिवजयंती इत्यादि, पाऊसपाणी, पोच, फंडाची पोच, वर्तमानसार, व्यापारी बातम्या, सरकारी नेमणुका वगैरे. अशा सदरांचा समावेश सूचींत केलेला नाही.

१२. सूचीतील नोंदींत योजलेलीं संक्षिप्तें –

जा – जानेवारी, फे – फेब्रुवारी, मा – मार्च, ए – एप्रिल, ऑ – ऑगस्ट, स – सप्टेंबर, आक्टो – ऑक्टोबर, नो – नोव्हेंबर. डि – डिसेंबर. तसेच ले० या गटांत (–) अशी खूण असल्यास व प० या गटांत (–) अशी खूण असल्यास तो लेख व तें पत्र निनांवी असें समजावें.

## कांही अपवाद

१३. (अ) व्याख्यानांच्या वृत्तान्ताची नोंद विषयवार न करतां 'व्याख्यानें' या शीर्षकाखाली वर्णक्रमानुसार वक्त्यांच्या नांवाने केली आहे. उपवक्त्यांच्या नांवाची नोंद नाही.

(आ) वाचकांचीं पुष्कळ पत्रें निनांवी व कांही थोडीं नांवाने प्रसिद्ध झालीं आहेत. विषयाखाली त्यांची नोंद आहे व तेथेच पत्रलेखकाचें नांवहि दिलें आहे. पण पत्रलेखकाच्या नांवाखाली वेगळी नोंद नाही.

(इ) कित्येक पत्रें, नांवी व निनांवीं सुद्धा, लेखांसारखीच आहेत. त्यांना लेख मानून त्यांची नोंद केली आहे.

(ई) मृत्युविषयक स्फुट सूचनांची नोंद 'मृत्यु – स्फुटलेख' अशा शीर्षकाखाली वर्णक्रमानुसार मृत व्यक्तीच्या नांवानेच फक्त केली आहे. तथापि अशा मृत व्यक्तींच्या नांवांची अन्य मजकुरामुळे वेगळी नोंद असल्यास त्या नोंदीतहि त्या व्यक्तीच्या मृत्यूचा उल्लेख केला आहे.

(उ) मृत्यूविषयक संपादकीय अथवा अन्य लेखांचीहि नोंद मृत व्यक्तीच्या नांवाखाली वेगळी केली आहे. तसेच 'मृत्यु – अग्रलेख' अशा शीर्षकाखालीहि ह्या नोंदी एकत्र केल्या आहेत.

(अू) पुष्कळ विषयांच्या संदर्भात प्रधान-शीर्पकाखालीच सर्व अग्रलेखांची नोंद आहे. उपशीर्षकाने जोडलेल्या शीर्षकाखाली पुन्हा त्या अग्रलेखकांची नोंद नाही.

(अे) कांही गटशीर्पकें योजिलीं आहेत. जसे – कालवे, किल्ले, खेळ, ग्रंथालयें, जिल्हा सभा, तालुका सभा, तीर्थक्षेत्रें, देवस्थानें, प्रवासवर्णनें, वातमीपत्रें वगैरे त्या त्या शीर्पकाला जोड देऊन तें समर्पक केलें आहे. पण उलटे पर्यायी संबंध दाखविले नाहीत. उदाहरणार्थ, खेळ – क्रिकेट असें शीर्पक आहे. पण, क्रिकेट, पाहा : खेळ – क्रिकेट असें पर्यायी शीर्षक नाही. गटशीर्पकें सहज सुचणारीं आहेत.

(अै) कांही जोडशीर्षकें योजिलीं आहेत. जसे – कवि आणि काव्य, दरोडे व दरोडेखोर, नाटक व नाटकप्रयोग, शेती व शेतकरी, संस्थानें व संस्थानिक वगैरे. तेथेहि उलटे पर्यायी संवंध दाखविले नाहीत.

## नमुना नोंद

ही नमुना नोंद त्रोटक आहे. याचा अर्थ मराठा इतिहास या शीर्पकाखाली सूचींत दाखविलेल्या सर्वच नोंदी प्रत्येक गटांत नमुना नोंदीत दाखविलेल्या नाहीत. कालसंदर्भात दाखविलेले अ, आ, अि, अी व अु हीं सावरकर लिपींतील अक्षरें अनुक्रमे पहिला, दुसरा, तिसरा, चौथा व पांचवा असे स्तंभ दाखविणारीं आहेत. सन १८८१ मध्ये केसरीच्या अंकांत प्रत्येक पानांत फक्त दोन, सन १८८२ व १८८३ सालीं फक्त तीन व सन १८८४ पासून पुढे फक्त पांच स्तंभ आहेत.

**मराठा इतिहास**

आणखी पाहा : अफजुलखान;....भवानी तलवार; भारत इतिहास संशोधक मंडळ;....शिवाजी (छत्रपति)....इत्यादि

अग्र० 'शिवाजी आणि ब्राह्मण' – इतिहासापासून घ्यावयाच्या बोधाविषयी, १८९९ ऑ २२ : २ अि

स्फु० अफजुलखान व शिवाजी या विषयावरील करकेरिया यांच्या निबंधवाचनाच्या निमित्ताने, १८९४ मे १ : ३ अ

ले० 'मराठ्यांचा इतिहास नव्याने लिहावयास हवा' (–), १८९६ ऑ २५ : ३ अि

प० पेशवाईतील वाजारभावावद्दल, १९११ आक्टो १७ : ३ अपु, १९१२ जा ९ : २ अी (ज. स. करंदीकार)

सं० माहिती गोळा करण्यासाठी मराठी इतिहास संशोधकांस प्रश्नावलि, १९११ फे २१ : ३ अपु (न. चिं. केळकर)

**मराठा इतिहास – जंजिरा मोहीम**

## स्पष्टीकरण

मराठा इतिहास या शीर्षकाखाली पाहणारास सूचींतील आणखी कांही शीर्षकें पाहणें इष्ट वाटेल म्हणून अशा शीर्पकांचा 'आणखी पाहा'ने निर्देश केला आहे.

अग्र० 'शिवाजी आणि ब्राह्मण' या अग्रलेखांत आलेल्या मजकुराचें त्रोटक विवरण 'इतिहासापासून घ्यावयाच्या बोधाविषयी' असें आहे. हा अग्रलेख केसरीच्या २२ ऑगस्ट १८९९ सालच्या अंकांत असून तो दुसऱ्या पानावर तिसऱ्या स्तंभांत सुरु होतो.

स्फु० करकेरिया यांच्या निबंधवाचनाच्या निमित्ताने लिहिलेल्या या स्फुटांत अफजुलखान व शिवाजी या विषयावर काही संपादकीय टिपण आहे. तें टिपण 'अ' म्हणजे पहिल्या स्तंभांत तिसऱ्या पानावर आहे.

ले० हा लेख निनावी आहे म्हणून (–) अशी खूण.

प० पेशवाईतील वाजारभावावद्दल ज. स. करंदीकर यांची दोन पत्रें प्रसिद्ध झालीं आहेत. तीं अनुक्रमे १७ आक्टोबर १९११ च्या अंकांत पुरवणीच्या तिसऱ्या पानावर पहिल्या स्तंभांत व ९ जानेवारी १९१२ च्या अंकांत दुसऱ्या पानावर चौथ्या स्तंभांत आहेत.

सं० न. चिं. केळकर यांचें हें केसरीला पाठविलेलें पत्र नसून मराठी इतिहास संशोधकांस उद्देशून केलेलें विनंतीपत्र आहे म्हणून संकीर्ण.

मराठा इतिहास – जंजिरा मोहीम : मूळ शीर्षक 'मराठा इतिहास.' त्याला जंजिरा मोहीम अशी जोड देऊन ते अधिक सूक्ष्म किंवा समर्पक केलें आहे.

## दिवाळीनिमित्त प्रसिद्ध न झालेल्या अंकांचा तपशील

| | | |
|---|---|---|
| १८८१ आक्टो २५ | १८८२ नो १४ | १८८३ आक्टो ३० |
| १८८४ आक्टो २१ | १८८५ नो १० | १८८६ आक्टो २६ |
| १८८७ आक्टो १८ | १८८८ अंक बंद नव्हता | १८८९ आक्टो २२ |
| १८९० नो ११ | १८९१ नो ३ | १८९२ आक्टो २५ |
| १८९३ नो ७ | १८९४ अंक बंद नव्हता | १८९५ आक्टो १५ |
| १८९६ नो ३ | १८९७ आक्टो २६ | १८९८ नो १५ |
| १८९९ नो ७ | १९०० आक्टो २३ | १९०१ नो १२ |
| १९०२ नो ४ | १९०३ आक्टो २० | १९०४ नो ८ |
| १९०५ आक्टो ३१ | १९०६ आक्टो २३ | १९०७ नो ५ |
| १९०८ आक्टो २७ | १९०९ नो १६ | १९१० नो १ |
| १९११ आक्टो २४ | १९१२ नो १२ | १९१३ नो ४ |
| १९१४ अंक बंद नव्हता | १९१५ नो ९ | १९१६ आक्टो ३१ |
| १९१७ नो १३ | १९१८ नो ५ | १९१९ आक्टो २८ |
| १९२० नो १६ | | |

## सूचीसाठी उपलब्ध न झालेल्या अंकांचा तपशील

| | |
|---|---|
| १८८४ जा १ | १८९७ जा ५, स २८ |
| १८८५ जा ३, १३, २७; फे ३, १० | १९०१ फे १२ |
| १८९१ डि २२ | १९१२ फे २२, मे १७, जून २१ |
| १८९३ स १२ | १९१४ मा १० |
| १८९४ जा ९, ऑ ७, १४, २१ | |

# केसरी सूची

## ( १८८१–१९२० )

अ

**अक्कलकोट सं०**

आणखी पाहा : वातमीपत्रें

स्फु० शहाजीराजे यांना वहिवाटीचा अधिकार, १८९१ डि १ : ३ अि, राजे फत्तेसिंग भोसले रणभूमीवर जाऊन आले, १९१५ स १४ : ६ अी, १९१६ ऑ २९ : ५ अ

ले० 'अक्कलकोटकर फत्तेसिंग भोसले' (चिं. गं. भानू), १९१० आक्टो २५ : ७ अि

सं० महाराजांची सोलापूरच्या स्त्री-वैद्यकीय शाळेस देणगी, १८८९ स ३ : ३ अु

**अगम्य गुरु (महात्मा)**

स्फु० भारतांतील इंग्रज अधिकाऱ्यांच्या उद्दामपणाबद्दल इंग्लंडांत भाषण, १९०६ डि ४ : ५ अी

ले० 'महात्मा अगम्य गुरु', १९०६ फे २० : ४ अ

**अग्रवाल, कल्याणमल**

ले० 'गीतारहस्याचा परिणाम', १९१८ मा १९ : ७ आ

**अजमीर (आगबोट)**

स्फु० केळवे माहीमजवळ ही आगबोट फुटली, १८९५ जुलै २ : ३ अ

प० अपघाताचा तपशील, १८९५ जुलै ९ : २ आ (–)

**अजितसिंह**

सं० पंजाबमधील लजपतरायांच्या या सहकाऱ्याविषयी, १९०७ जून १८ : ७ आ, राजद्रोही लेखासंबंधाने कोर्टांत खटला, १९१० जा १८ : २ अी

**अत्तर**

ले० अत्तराविषयी माहिती (ग. कृ. पाटणकर), १९१४ जून ९ : १ अपु

**अर्थशास्त्र**

आणखी पाहा : संपत्ति

अग्र० 'अर्थशास्त्रदृष्टचा आवश्यक सुधारणा'– सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांतील लेखावरून १८८५ ऑ ११ : २ अि, ऑ १८ : २ आ, ऑ २५ : २ अि, स ८ : २ अि, स २२ : ३ अ, 'अर्थशास्त्र आणि वेदान्त'– अर्थशास्त्रावरील प्राचीन ग्रंथ कां नाहीत यासंबंधी, १९११ मा १४ : ४ अी

स्फु० पाश्चात्य सिद्धान्त हिंदुस्थानास लागू करणें चूक अशी सर थिओडोर मॉरिसन यांची पाटणा येथील चाणक्य मंडळांतील भाषणांत कबुली, १९१३ ए १५ : ५ आ

**अधिक मास**

पाहा : पंचांग

**अनंतमहाराज (स्वामी)**

प० तुकारामांचे समकालीन स्वामी अनंतमहाराज यांची कविता प्रसिद्ध करावी, १८९९ जून २० : ३ अु (–)

**अन्नधान्य किमती**

पाहा : महागाई

**अनाथगृह**

स्फु० विधवांच्या अनौरस मुलांसाठी, १८८५ मा १७ : ३ आ

**अनाथगृह – अजमीर**

ले० 'आर्यसमाज आणि अनाथ'– आर्यसमाजाने चालविलेल्या दयानंद अनाथालयाविषयी, (–) १९११ जुलै १८ : २ अ

**अनाथगृह – भावनगर**

स्फु० ठाकुरसाहेबांनी नव्याने स्थापलेल्या संस्थेच्या निमित्ताने, १८८५ मा १७ : ३ अि

**अनाथ वालकाश्रम, पंढरपूर**
सं० १९१४–१५ सालच्या अहवालासंबंधी, १९१५ नो ३० : ९ आ
**अनाथ वालिकाश्रम, पुणें**
पाहा : महिला विद्यापीठ, महिलाश्रम
**अनाथ विद्यार्थीगृह, चिंचवड**
स्फु० मदतीसाठी गंधर्व नाटक मंडळीचा प्रयोग, जगदीशचंद्र बोस यांची भेट, देणग्या, १९१८ फे १९ : ५ अी, फे २६ : ५ अि
सं० लो. टिळकांच्या हस्तें इमारतीचा पायाभरणी-समारंभ, १९१८ मा २६ : २ अु, इमारतीचें उद्घाटन – म. गांधीच्या हस्तें, जून १८ : ७ अि
**अनाथ विद्यार्थीगृह, पुणें**
स्फु० १९१४ जून ९ : ५ आ
सं० वार्षिक अहवाल, १९१७ आक्टो २३ : ७ आ
**अनाथालय, वार्शी**
स्फु० स्थापना, १९०५ ऑ १ : ५ अी
**अनुकरण, पाश्चिमात्यांचें**
अग्र० 'अनुकरण', १८८१ ऑ ९ : १ अ, ऑ १६ : १ अ, ऑ २३ : १ अ, स ६ : १ अ, स १३ : १ अ, स २० : १ अ, स २७ : १ अ, आक्टो ४ : १ अ, 'प्रस्तुत वादापासून घेण्यासारखी गोष्ट', १८८३ मा २० : १ अ, 'राजकीय हिताविषयी युरोपियन लोकांची अद्वितीय दक्षता' ए ३ : २ आ, 'साहस आणि धोरण', १८८४ जून १० : २ अी, 'इंग्रजांपासून घेण्यासारखी एक गोष्ट', आक्टो ७ : ३ अ, 'हे गुण आमच्यांत केव्हा येतील', १८९० मे ६ : २ अि, 'डोळे उघडा आणि वाहेर काय चाल्ले आहे तें पाहा', ऑ. २६ : २ अु
प० १८८१ ऑ ३० : ५ अि (–), स २७ : ६ अि (दा. म. चि.)
**अफगाण युद्ध**
आणखी पाहा : सीमा, वायव्य
अग्र० 'रशिया, अफगाणिस्तान आणि हिंदुस्थान', १८८१ फे २२ : ३ आ, 'लढाईची खुमखुम', १८८५ मे ५ : १ अु, 'अरिष्ट वहुशः टळणार', मे १२ : २ अ, 'सरहद्दीवरील लष्करी धोरण', १८९८ मा १ : २ अि
स्फु० १८८१ फे १ : ६ अ, फे १५ : ६ आ, फे २२ : ६ आ, मा २२ : ५ आ, ६ अ, म १३ : ५ आ, नो २२ : ५ आ, अि, १८९८ मा ८ : २ अु, ३ अ

**अफगाणिस्तान**
आणखी पाहा सीमा, वायव्य
स्फु० १८८७ ए १४ : ३ अी १८९२ ऑ १८ : ३ अ, १९०१ आक्टो २२ : २ अु, नो ५ : ५ अि, नो १९ : ५ अु, १९०२ फे ११ : ५ अि, फे २५ . ५ अी, ए २९ : ५ आ, स २ : ५ आ, स ९ : ५ आ, १९०४ जून २१ . ५ आ, आक्टो ११ : ५ अ, आक्टो २५ : ४ अु, १९०५ फे १४ : ५ अि, फे २१ : ५ अ, ए २५ : ४ अु, मे ३० . ५ अ, आ, जून १३ : ५ अि, १९१४ ए २१ : ५ अी, १९१९ मे २० : ४ अि, मे २७ : ५ अ, जून ३ : ५ अ, जून १० : ५ अ, जून २४ : ४ अी, ऑ ५ : ४ अी, ऑ १२ : ५ अ, नो ४ : ४ अि, अी, अु, नो १८ : ५ अ, डि ९ : ५ अि
ले० 'हिंदुस्थानांतील एतद्देशीय संस्थानें' – लिपेल ग्रिफिन, याच्या इंग्लंडमधील व्याख्यानांत अफगाणिस्तानचा समावेश, १८८९ ऑ २७ : २ अु
सं० वंड, १९१२ मे १४ : २ अु
**अफगाणिस्तान – अमीर – अवदुल रहमान**
अग्र० 'अमीर अवदुल रहमान खान', १८८५ ए १४ : २ आ, 'काबूलचे अमीर अवदुल रहिमान यांचा मृत्यु', १९०१ आक्टो १५ : २ अि
स्फु० १८८३ ऑ २१ : ३ आ, १८८५ ए ७ : ३ अु, ए १४ : ३ अि, १८९२ ऑ ९ : ३ आ, १८९३ आक्टो २४ : ३ अ, डि १२ : ३ अी, १८९५ ए २३ : ३ अ, जून १८ : ३ अि, स १० : ३ अी
**अफगाणिस्तान – अमीर – हवीवुल्लाखान**
अग्र० 'अमीर व इंग्रज', १९०७ फे ५ : ४ अि
स्फु० १९०६ स १८ : ५ अि, स २५ : ५ अी, १९०७ जा ८ : ५ आ, जा १५ : ५ अ, जा २२ : ५ अ, जा २९ : ४ अु, ५ अ, फे ५ : ५ अ, फे १२ : ५ आ (सचित्र), फे १९ : ५ अि, जुलै २ : ५ आ, जुलै ९ : ४ अु, १९०८ फे ११ : ५ आ, ए २८ : ५ अी, १९१९ मा ४ : ४ अु, जुलै २२ : ४ अी, अु, जुलै २९ : ५ अि
सं० अमीराचा हिंदुस्थानातील प्रवास, १९०७ जा १५ : ७ अ, जा २२ : ७ अ, आ, जा २९ : ७ अ, फे ५ : ७ आ, फे १२ : ७ आ, फे १९ : २ अु, मा १२ : ७ आ
**अफगाणिस्तान – इंग्लंड – संबंध**
स्फु० १९०३ ए १४ : ५ अि, ए २१ : ४ अु, ५ अ, ए २८ : ५ अु, मे ५ : ४ अु, ५ अ, मे २६ : ४ आ, १९१९ स ३० : ४ अु, ५ अ

**अफझुलखान**

आणखी पाहा : शिवाजी (छत्रपति)

स्फु० वधासंबंधीच्या पोवाड्याविषयी, १९०० जून १९ : ३ अु, महाबळेश्वर येथील उत्सवासंबंधी, १९११ मे १६ : ५ आ, 'कॉमरेड' पत्र व अफझुलखानाचा वध, मे ३० : ५ अ

प० १९१९ नो १८ : ७ अ (पां. मा. चांदोरकर)

**अफू**

आणखी पाहा : अबकारी कायदा; अबकारी खातें; मादक पदार्थ

अग्र० 'बजेट अथवा वार्षिक जमाखर्चाचा खर्डा : अफू', १८८२ मे २२ : १ अि

स्फु० खप कमी व्हावा या हिंदुस्थान सरकारच्या ठरावाविरुद्ध होणाऱ्या टीकेविषयी १८९१ ए २८ : ३ आ, खप बंद व्हावा म्हणून अँटी-ओपियम अलायन्सची मुंबईत स्थापना, स ८ : ३ अि, बंदीसंबंधी नैतिक व व्यावहारिक विचार व्हावा, १८९३ जुलै २५ : ३ अि, डि १२ : ३ अि, मादक पदार्थ म्हणून बंदी आवश्यक १८९४ फे २० : ३ अ, व्यापार बंद करण्याबद्दल पार्लमेंटचा ठराव हिंदुस्थानास नुकसानकारक, १९०६ जुलै ३ : ५ अि, चीनला जाणाऱ्या अफूवर कर बसवून हिंदुस्थानांतील अफू-लागवडीवर नियंत्रण, १९०७ मा २६ : ५ अ, अंदाजापेक्षा किंमत जास्त आल्यामुळे सरकारी तिजोरीत भर, १९१० ए १२ : ४ अी, चीनसरकारच्या अफूबंदीसाठी हिंदुस्थानांतील अफूलागवड करणाऱ्यांच्या नुकसानीचाहि विचार व्हावयास हवा, १९११ मे २ : ५ अ, इंग्लंड व चीनमध्ये अफूसंबंधीचा करार, मे १६ : ५ अि, मुंबई इलाख्यातील अफूचा खप, मे ३० : ५ अि, अफूबंदीविषयी सरकारी धोरण, १९१२ ऑ २७ : ५ आ, चीनशीं व्यापार बंद झाल्यामुळे उत्पन्न बुडणार, १९१३ जा १४ : ५ अ, अफूच्या व्यापाऱ्यांचें नुकसान, फे ११ : ५ अ, मॉटेग्यूसाहेबांचे आश्वासन, मे १३ : ५ अि

**अबकारी कायदा**

आणखी पाहा : अफू; अबकारी खातें; मद्यपान; मादक पदार्थ

अग्र० 'मुंबईचें कायदे कौन्सिल'–अबकारी विधेयकासंबंधी, १८८२ जुलै ११ : १ अ, 'अबकारी कायदा', जुलै ३१ : १ अ, 'मोहाच्या फुलांचा कायदा', १८९२ ए १९ : २ अी

स्फु० मुंबई कायदे कौन्सिलांतील चर्चेसंबंधी, १८८२ जून २७ : ४ आ, नो ७ : ६ अ, मोहाच्या फुलासंबंधी, १८९२ मा ८ : ३ अि, ठाणें व कुलाबा जिल्ह्यांत ताडीसंबंधी अन्याय, मे ३ : ३ अि, गरीब लोकांस छळण्यासाठी पोलिसांस नवें साधन, मे ३१ : ३ अु, सिलेक्ट कमिटींत नूलकरांनी बाजू नीट मांडली नाहीं म्हणून कायदा मंजूर व्हायला मदत, जून ७ : ३ अि, जुलै ५ : ३ आ, मोहाच्या फुलांचा कायदा नामंजूर, डि ६ : ३ अु

**अबकारी खातें**

आणखी पाहा : अफू; अबकारी कायदा; मद्यपान; मादक पदार्थ

अग्र० 'दारू खात्याचा उलटा न्याय', १९१५ जून २२ : ६ अ

स्फु० दुकानांस परवाने देण्याच्या नियमासंबंधी, १९०४ जुलै २६ : ५ अी, मद्यपानाच्या वाढीला सरकार जबाबदार, १९०५ जून २७ : ५ अी, अबकारी खात्याचा द्रव्यलोभ, १९०९ मे १८ : ५ आ, ताडीबद्दल ठराव, मे १८ : ५ आ, स्थानिक अबकारी खात्याचें काम चांगले झालें म्हणून हक्क वाढवावे, जुलै २६ : ५ अी, मुंबई विधिमंडळांतील प्रश्नोत्तरें, १९१० जुलै १२ : ४ अु, ५ अ, १९०९–१० च्या रिपोर्टाविषयी, १९११ जा २४ : ५ अी, जा ३१ : ५ अि, अी, फे १४ : ५ अी, मुंबई विधिमंडळांतील उत्तरांविषयी, ए ११ : ५ अ, आ, ना. लँब व सरकारचें अबकारी धोरण, ए २५ : ५ अि, १९१०–११ च्या रिपोर्टाविषयी, १९१२ मे २१ : ४ अु, १९१३ ए २९ : ५ अि, अी, अबकारी कमिटया, १९१५ ऑ १७ : ७ अ, दारूवरील वाढलेल्या ड्यूटीचे परिणाम, १९१६ जून २० : ४ अु, पूर्व खानदेशांत कमिटया नेमण्याचा प्रस्ताव, १९१७ ए ३ : ५ आ, मद्यपानबंदीच्या आड येणाऱ्या कमिटया, डि ११ : ५ अि, दारूचीं दुकानें लिलावाऐवजी कायमचीं देण्याची योजना, पण लिलावाने देण्याचा पुन्हा निर्णय, डि २५ : ५ अ, आ, अधिकाधिक वसुलीची खटपट – अंदाजपत्रकावरील चर्चेवरून, १९१८ मा १२ : ४ अि, सरकारकडून मद्यपानास उत्तेजन १९१६–१७ सालच्या अहवालावरून, जून ४ : ४ अु, ५ अ, मक्तेदारी पद्धतीमुळे वाढलेल्या उत्पन्नाचा विनियोग, स २४ : ५ अि

खटल्याबद्दल जुलै २३ : ५ अि, ऑ १३ : ५ अी, ऑ २० : ५ अि, निर्दोष सुटका, ऑ २७ : ५ अि

**असहकारिता**

आणखी पाहा : बहिष्कार; सत्याग्रह

अग्र० 'साहचर्य म्हणजे सहकारिता नव्हे', १९२० जुलै १३ : ४ अ, 'असहकारितेचा व्यापक अर्थ', जुलै २७ : ४ आ, 'एकाच पक्षाचे दोन पंख' – कौन्सिल बहिष्कारावाबत राष्ट्रीय पक्षात मतभेद, स २१ : ४ आ, काही आक्षेपांस थोडे उत्तर', आक्टो ५ : ४ अ, 'असहकारितेची सूत्ररूप चर्चा' – केसरीकारांची भूमिका, आक्टो १२ : ४ अि, 'महात्मा गांधींची पुण्याला भेट' – असहकारितेचा उपदेश, नो ९ : ४ अ, 'असहकारितेचा पहिला धडा, नो २३ : ४ अि

स्फु० असहकारितेच्या धोरणाविषयी बंगाली राष्ट्रीय पत्रांच्या मतासंबंधी, १९२० जुलै ६ : ४ अि, अी, चळवळीविषयी मवाळांची प्रतिक्रिया ऑ १७ : ५ आ, संयुक्त प्रांताचे गव्हर्नर बटलर यांचे प्रलाप, ऑ ३१ : ५ अ, गुजराथ प्रांतिक सभेतील ठरावाविषयी, ऑ ३१ : ५ आ, ठरावाच्या अंमलबजावणीसाठी मतभेद, आक्टो ५ : ४ अि, अी, चळवळ विनसनदशीर असे लॉर्ड विलिंग्डन यांचें विधान, आक्टो १९ : ४ अी, अु, खानेसुमारीबाबतीतहि असहकारिता आवश्यक, आक्टो १९ : ४ अु, लॉर्ड चेम्सफर्ड यांना नागपूर, जबलपूर येथे मानपत्र नाही, आक्टो २६ : ४ अि, इजिप्त, सिलोन येथेहि अवलंब, आक्टो २६ : ५ अ, परिणाम स्पष्ट दिसूं लागला म्हणून निवडणुकीसाठी उमेदवाराना सवलती, नो २ . ४ अु, चंदावरकर यांची चर्पटपंजरी, नो २ : ५ अ, स्त्रियांचा प्रतिसाद, नो ९ : ४ अि, विधिमंडळ निवडणुकीवरील बहिष्काराबाबत सरकारी प्रतिक्रिया, नो ९ : २, ४ अि, अी, चळवळ हाणून पाडण्यासाठी सातारा येथे सत्यशोधक समाजाचा उपक्रम, नो ९ : ४ अी, अु, सरकारचा गुप्त मारा, नो २३ : ४ अु, ५ अ, राष्ट्रीय सभेचा निर्धार, डि ७ : ४ अी, बेळगाव व पश्चिम खानदेश येथील कलेक्टरांचें अश्लाघ्य वर्तन, डि २१ : ४ अु, विद्यार्थ्यांमध्ये वेगाने प्रसार, डि २८ : ५ अ, जागरूक शेतकरी, डि २८ : ५ अि

ले० 'हें लोण खेड्यापर्यंत पोचवा' (दिनकर), १९२० नो ९ : ७ अ, 'बमनजी शेट व असहकारिता' (मुलाखत), नो २३ : २ अि, 'बंधमुक्त हिंदुस्थान' (बर्नार्ड हौटन), डि २१ : ७ अ

प० इंग्लिश गृहस्थांस अनावृत पत्र – यंग इंडियामधून भाषांतर, १९२० जून २९ : २ अु, नो २२ : २ अ (मो. क. गांधी)

सं० चंपारण्यांतील निःशस्त्र प्रतिकाराबाबत गांधी यांची मॅजिस्ट्रेटला नोटिस, १९१७ ए २४ : ७ अ, हिंदी मजुरांवर चंपारण्यांत अत्याचार जून ५ : ५ आ. गुजराथेंतील चळवळ, १९२० जुलै २० : २ अि, जुलै २७ : ७ अी, लोकमत, ऑ २४ : २ अु, राष्ट्रीय सभेच्या जादा बैठकीत चर्चा, स १४ : २ अ, ४ अ, ठरावाची बजावणी, स २१ : २ अु, राष्ट्रीय पक्ष निवडणुकीत सामील होत नाही, स २१ : ४ अ, स २८ : ४ आ, आक्टो ५ : ५ अु, ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सूचना, ऑक्टो १२ : ४ आ, पुणें येथील कमिटी, आक्टो १२ : ४ आ, पुणें जिल्ह्यांतील चळवळ, आक्टो १९ : ५ अु, ठिकठिकाणची चळवळ, आक्टो १९ : ७ आ, आक्टो २६ : ५ अु, ७ आ, नो २ : ५ अी, ७ अ, नो ९ : ७ अि, डि ७ : ७ अि, बेंजामिन स्पूर या ब्रिटिश मजूर पुढाऱ्याची मुलाखत, डि २१ : २ अु, पूर्व आफ्रिकेंतील असहकारिता, नो ३० : २ आ

**अस्पृश्यवर्ग**

अग्र० 'शूद्र लोकांची सामाजिक स्थिति, १८८४ जून ३ : २ अु

स्फु० स्थिति सुधारण्याबद्दल सरकारकडे अर्ज, १९०४ जुलै १९ : ४ अि, अर्जास सरकारच्या वाटाण्याच्या अक्षता, नो १५ : ५ आ, मोहपा येथील सन्मार्गबोधक अंत्यज समाजाच्या स्थापनेनिमित्त, १९०५ मा २१ : ५ अी, अस्पृश्य जातीच्या उद्धारासाठी देशी मिशनऱ्यांचें गव्हर्नरकडे शिष्टमंडळ व त्यास सरकारचें उत्तर, १९१० ऑ ३० : ५ अि, ठाणे येथील अस्पृश्य जातीच्या मंडळाचा शिक्षणविषयक चळवळीसाठी सरकारकडे अर्ज, स १३ : ५ अी, अस्पृश्योद्धारासाठी स्थापन झालेल्या मिशनचा वार्षिक समारंभ, आक्टो ४ : ५ अी, त्या चंदावरकर यांचे मननीय भाषण, डि १३ : ५ अि, स्टेट सेक्रेटरीकडे महारांचा अर्ज, डि २७ : ५ अि, शिक्षणासंबंधीं सरकारचें निराशाजनक धोरण, १९१५ ऑ ३१ : ६ अी, डिप्रेस्ड क्लासेस मिशनचा वार्षिक समारंभ, १९१६ जुलै ४ : ४ अु, महार लोकांची सभा

व सैन्यप्रवेश, १९१७ स ११ : ५ अि, स्वराज्यमागणीला मुंबईतील सभेंत विरोध, नो २० : ५ आ, मॉंटेग्यूंना भेटलेल्या अस्पृश्यांच्या शिष्टमंडळाविषयी, नो २० : ५ अ, मुंबईंतील अस्पृश्यतानिवारक परिषद यशस्वी, १९१८ मा २६ : ५ अि

प० १९१५ आक्टो २६ : ९ आ (–), १९१७ आक्टो २३ : ७ अी (ना. व. भोसले), १९१८ जून ४ : ७ अि (दा. ना. पटवर्धन)

**अस्मान झा वहादुर**

स्फु० यांच्या देणग्या, १८८७ आक्टो ४ : ३ अी, १८८८ जुलै ३१ : ३ अि

**अहमदाबाद**

ले० 'अहमदाबादेविषयी दोन शब्द' – सर्वसाधारण माहिती, १८८७ ऑ ९ : २ अी, ऑ १६ : ३ अि, स्वच्छतेच्या अभावासंबंधी, ऑ २३ : ३ अी, जैनधर्मानुयायी लोकांविषयी, ऑ ३० : २ अ, वैवाहिक चाली वगैरे, स ६ : २ अी, विवाहादि संस्कार, स १३ : ३ अी, मुलींचें गृहशिक्षण, स २० : १ अ, विचित्र चाली, स २८ (२७) : १ अु, किरकोळ माहिती, आक्टो ४ : १ अु, लोकांचें मोठें व्यसन पैसा, आक्टो ११ : ३ अु

**अहमदाबाद वॉंव-प्रकरण**

पाहा : वॉंव-प्रकरणें

**अहिर शिंपी (जात)**

स्फु० समाजाचें अधिवेशन, १९१७ मे २९ : ५ अि

**अळेकर, ना. रं.**

आणखी पाहा : व्याख्यानें

ले० 'हिंदुस्थान व पार्लमेंट', १९१३ जून २४ : ४ अ

**अंजुमान-इ-इस्लाम**

स्फु० गव्हर्नरकडे मागण्या, १९१९ जुलै २२ : ५ अ

**अंडरग्रॅज्युएट असोसिएशन, मुंबई**

स्फु० विद्यापीठ सिनेटच्या सभेस वातमीदार हवे; विद्यापीठाच्या ग्रंथालयांतून पदवीधरास व विद्यार्थ्यास पुस्तकें मिळावीं अशी मागणी, १८८६ ऑ २४ : ३ अि

**अंत्यसंस्कार**

स्फु० भट्टींत प्रेत दहन करण्याच्या पद्धतीबद्दल, १८८७ स २० : ३ अि, अु, मुंबईंतील प्रेतदहन भट्टीची योजना रद्द, नो ८ : ३ अि, ब्राह्मणाचा अंत्यसंस्कार सोनाराने केला त्यास आधारभूत शास्त्रवचनें, १८९२ ऑ १६ : ३ आ

**अंदाजपत्रक**

आणखी पाहा : आर्थिक स्थिति, दारिद्रय

अग्र० '१८८१–८२ सालच्या जमाखर्चाचा अंदाज', १८८१ ए १२ : ४ आ 'लॉर्ड हार्टिंग्टन आणि इंडियन वजेट', स २० : २ अ, 'वजेट अथवा वार्षिक जमाखर्चाचा खर्डा', १८८२ ए १८ : २ अि, मे २ : १ अि, 'हिंदुस्थान सरकारचा जमाखर्चाचा खर्डा व वजेट', १८८३ मा २७ : ३ आ, 'हिंदुस्थानसंबंधाने विलायतेंत अनास्था', १८८६ ऑ ३ : २ अ, 'हिंदुस्थानच्या जमाखर्चाची दुःस्थिति, १८८७ ऑ ३० : २ आ, 'हिंदुस्थानच्या जमाखर्चाचा खर्डा', १८८८ स ४ : १ अी, 'हिंदुस्थानच्या जमाखर्चाबद्दल पार्लमेंटांत यंदा झालेला वाद-विवाद', १८९३ आक्टो १७ : २ अी, 'वजेटावरील वादविवाद', १८९५ ए ९ : २ अी, ए १६ : २ अु, 'हिंदुस्थानच्या जमाखर्चाचा खर्डा', १८९६ मा २४ : २ अी, स १५ : २ अ, 'हिंदुस्थान सरकारचा सन १८९७–९८ सालचा जमाखर्चाचा खर्डा', १८९७ मा ३० : २ अी, 'हिंदुस्थान सरकारचा जमाखर्चाचा खर्डा', १८९८ ए ५ : २ अि, 'वजेटावरील वादविवाद', १८९९ ए ४ : २ अि, 'सरकार-सरकारचें भांडण' स ५ : २ अि, 'हिंदुस्थान सरकारचें वजेट' १९०१ मा २६ : २ अि, 'हिंदुस्थानचें १९०२–०३ सालाच्या जमाखर्चाचें अंदाजपत्रक', १९०२ मा २५ : ४ अि, '११० कोट रुपया कसा उडतो' ए १ : ४ अि, 'आणखी गोरें सैन्य पाहिजे', १९०२ नो १८ : ४ अि 'सरकारच्या दोन उदार देणग्या', १९०३ मा २४ : ४ अि, 'हिंदुस्थानच्या राज्यकारभाराच्या सुधारणेची खरी दिशा', मा ३१ : ४ अि, 'चालू सालचें हिंदुस्थान सरकारचें अंदाजपत्रक', १९०४ ए १२ : ४ अि, 'कराची सूट आणि वाकीची लूट', १९०५ मा २८ : ४ अी, हिंदुस्थानच्या वजेटवरील पार्लमेंटांतील वादविवाद', जुलै १८ : ४ अि, 'हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाचा खर्डा', १९०६ मा २७ : ४ आ, 'मि. मोर्ले यांचें वजेटावरील भाषण', जुलै २४ : ४ आ, 'हिंदुस्थान सरकारच्या जमाखर्चाचा खर्डा', १९०७ मा २६ : ४ आ, 'भरभराटीचें भूत', १९०८ मा ३१ : ४ अि, 'विदेशी व्यापाराची मंदी', १९०९ मा ३० : ४ आ, 'पिशवीचें तोंड कोणाच्या हातांत राहणार?' १९१० जा १८ : ४ अि, 'जमेची तूट की खर्चाची तूट', मा ८ : ५ अ, 'भरभराटीचें वजेट', १९१३ मा ११ : ४ अि, 'कर

कां कर्ज', १९१५ मा ९ : ६ आ, 'करांचा पूर्वेतिहास', मा २३ : ६ अ, 'कर वाढवावयाचेच तर हे वाढवा', १९१६ फे २९ : ६ अ, 'पुढील सालचें अंदाजपत्रक', मा ७ : ६ अ, 'वजेटाचा वोजवारा', १९१८ फे १९ : ४ अी, 'हा व्रह्मघोटाळा संपणार कधी ?' मा ५ : ४ अी

स्फु० १८८४ मा १८ : ३ अि, १८८५ ऑ ११ : ३ आ, १८८७ मा २९ : ३ अी, १८८८ ए ३ : ३ अी, सरहद्दी-वाहेरचा खर्च हिंदुस्थानवर लादू नये, जून २६ : ३ अु, १८८९ ए २ : ३ आ, पार्लमेंटांत चर्चा, स ३ : ३ अि, १८९० मा २५ : ३ अी, १८९१ मा २४ : ३ अि, ऑ ११ : ३ अी, १८९३ जा २४ : ३ अी, मा २८ : ३ अ, आ, ए १८ : ३ अ, आ, १८९४ फे २० : ३ अ, फे २७ : ३ आ, मा २७ : ३ आ, चर्चा करण्याच्या कायदेकौन्सिल मेंवरांच्या हक्कासंवंधी, जुलै २४ : २ अी, युरोपीय नोकराचें निवृत्तिवेतन, सरहद्दीवरील लढाया वगैरेमुळे तोटा, १८९५ मा २६ : ३ अ, स १० : ३ अि, वेल्वी कमिशनपुढे लष्करी खर्चाबावत साक्ष, १८९६ ऑ ११ : ३ अु; ऑ १८ : ३ आ, दुष्काळ फंड युद्धखर्चासाठी १८९७ मा २३ : ३ अ, ऑ ३१ : ३ अ, १८९८ मा २९ : २ अी, अु, पार्लमेंटांत अनास्था, जून २८ : २ अु, ऑ १६ : ३ आ; १८९९ मा २१ : ३ अ, ए २५ : ३ अि, ऑ १५ : २ अु, ३ अ, इंडिया पत्रांतील टीका, स ५ : ३ अ, १९०० मा २७ : ३ अ, ऑ ७ : ३ आ, १९०१ स १० : ३ अ, आ, भारताच्या संपन्नतेचे खोटें चित्र, १९०२ नो १८ : ५ आ, पार्लमेंटांत हेन्री फौलर यांचें भारतातर्फे भाषण, डि ९ : ५ अ, आ, अि; कर कमी केल्यावद्दल कर्झनची फुशारकी, १९०३ मा ३१ : ५ अ; ए ७ : ५ अ, आ, अि, ऑ १८ : ५ आ, अि, तिवेटी मोहिमेवरील खर्चाचें समर्थन, १९०४ ऑ १६ : ५ अि, १९०५ जून २७ : ५ आ, अि, १९०६ ऑ १४ : ४ अु, ५ अ, १९०७ ए २ : ४ अु, जून ४ : ४ अी, जून ११ : ५ अ, डि १० : ५ अि, १९०८ मा २४ : ५ आ, अि, १९०९ ए ६ : ४ अी, अु, ना. गोखले यांच्या भाषणावद्दल ए ६ : ५ अि, पार्लमेंटांत चर्चा, १९०९ ऑ १० : ५ आ, अि, ऑ ३१ : ५ आ; १९१० मा १ : ५ अि, मा १५ : ५ अ, ए ५ : ५ आ, अि, १९१० ऑ २ : ५ अ, आ, १९११ मा ७ : ५ अ, मा १४ : ४ अ, मॉंटेग्यूचें पार्लमेंटांतील भाषण, ऑ १ : ४ अ, ५ अ, आ; १९१२ मा १२ : ५ अ, आ, अि, ए २ : ५ अ, आ, ऑ ६ : ५ अ, इंग्लंडचें व हिंदुस्थानचें, १९१३ ए २९ : ५ अ, आ; ऑ १२ : ४ अि, अी, ऑ २६ : ४ अी, अु, ५ अ; १९१५ मा ३० : ६ अि, १९१७ मा ६ : ५ अ, आ, विधिमंडळांत सादर करण्याच्या पद्धतीत महत्त्वाची सुधारणा, १९१८ फे १२ : ४ अि, मा १२ : ४ अि, अी, स १७ : ४ अी, १९१९ मा ४ : ५ आ, मा ११ : ५ आ, मा २५ : ५ अि, अी, १९२० मा ९ : ४ अि, अी, मा ३० : ४ अि

सं० अंदाजपत्रकांतील महत्त्वाच्या वावी, १९०३ मा ३१ : ५ अी, पार्लमेंटांतील शुष्क वादविवाद १९०७ जून ११ : ७ आ, १९१५ मा ९ : ५ अ, १९१६ मा ७ : २ अ, मा १४ : २ अि, १९१७ मा ६ : ७ अ, १९१८ मा ५ : २ अि, मा १२ : ७ आ, मा १९ : २ अी, 'तिजोरीचा तावा', जुलै २३ : २ अी, 'कर वसविण्याचा अधिकार', जुलै ३० : २ अ, १९१९ मा ११ : २ अ, १९२० मा ९ : ७ अ, मा १६ : २ अ

**अंदाजपत्रक ( मुं. इ. )**

अग्र० 'मुंवई इलाख्याचें वजेट', १८९३ ऑ ८ : २ अि, मुंवई इलाख्याच्या जमाखर्चाचा तक्ता', आक्टो ३१ : २ आ, 'मुंवई इलाख्याच्या सन १८९५–९६ सालच्या जमाखर्चाचा खर्डा', १८९५ ऑ १३ : २ अी, 'वजेटावरील वादविवाद', ऑ २० : २ अी, 'मुंवई इलाख्याचा जमाखर्चाचा खर्डा', १८९६ ऑ २५ : २ अि, 'सन १८९७–९८ सालाचा मुंवई इलाख्याचा कारभार', १८९९ जा २४ : २ अि, 'मुंवई सरकारचें यंदाच्या सालचें वजेट' १९०० ऑ २८ : २ अि, 'चालू सालचें ह्या इलाख्याचें वजेट व त्यावरील वादविवाद', १९०२ स १६ : ४ अि, 'पोकळ वजेट व शुष्क वादविवाद', १९०४ स ६ : ४ अी, 'वजेटाची वैठक व गव्हर्नरसाहेवांचें भाषण', १९०८ जून २३ : ४ अ, 'वजेटाची फोड', १९१३ ऑ १२ : ४ अ, 'इलाख्याचा जमाखर्च', १९१५ जुलै २० : ६ आ, जुलै २७ : ६ अ

स्फु० १८९३ फे २१ : ३ अी, ऑ १ : ३ अ, १९०१ ऑ २७ : ५ अी, १९०३ ऑ २५ : ५ अि, शेतकी कायद्यावद्दल प्रश्नोत्तरें, १९०४ स ६ : ५ अि, १९०५ जुलै ११ : ५ अि, १९०७ जुलै २ : ५ अि, अी, ऑ ६ : ५ अी, १९०८ जून २३ : ५ अ, आ, डि ८ : ५ आ, अि, १९०९ जून २२ : ५ अ, आ, जून २९ : ४ अु, ५ अ, १९१० मा १५ : ५ अ, आ, १९११ मा १४ : ५ अ, १९१२ मा १९ : ५ आ, जुलै ९ : ५ आ, १९१३ ए १ : ५ अि, अी, ऑ १२ : ५ आ, १९१४ मा ३ : ४ अी, अु, जुलै २१ : ४ अु, १९१५

